**एकात्मिक बाल विकास सेवायोजना हया केंद्रपुरस्कृत योजनेसाठी पुरक पोषण आहार (SNP) अर्थसंकल्पित केलेला निधी खर्च करण्यास मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एबावि-२०१७/प्र.क्र.४८/का.५**
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ३० मार्च, २०१७

**प्रस्तावना :-**

महिला व बाल विकास विभागामार्फत एकात्मिक बाल विकास सेवायोजन ही केंद्रपुरस्कृत योजना आयुक्त,एकात्मिक बाल विकास सेवायोजन,नवी मुंबई या कार्यालयाकडून राबविण्यात येत आहे. SNP (पुरक पोषण आहार) या कार्यक्रमासाठी केंद्र व राज्य हिश्याचे प्रमाण ५०:५० असे ठरविण्यात आलेले आहे.

२. सन २०१६-१७ साठी SNP (पुरक पोषण आहार ) या कार्यक्रमासाठी केंद्र शासनाने रुपये ७९०५३.९६ लाखचा APIP मंजूर केलेला असून त्याच्या निधीचे प्रमाण केंद्र हिस्सा रुपये ३९५२६.९८ लाख व राज्य हिस्सा रुपये ३९५२६.९८ लाख असे आहे. सन २०१६-१७ या वर्षामध्ये SNP (विशेष पोषण आहार ) या कार्यक्रमासाठी केंद्र शासनाने आतापर्यत रुपये १९७६३.५० लाख इतका निधी राज्य शासनास उपलब्ध करुन दिलेला असून सदर निधी राज्याच्या कोषागारात जमा झालेला असल्याचे अर्थोपाय कार्यासनाकडून प्रमाणित करुन घेण्यात आलेले आहे. केंद्र शासनाकडून APIP च्या प्रमाणात निधी प्राप्त झालेला नसला तरी मुलांना वेळेत पोषण आहार उपलब्ध व्हावा यासाठी विशेषबाब म्हणुन APIP च्या मर्यादेत निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०१६-१७ साठी SNP (पुरक पोषण आहार ) या कार्यक्रमासाठी केंद्र शासनाने रुपये ७९०५३.९६ लाखाचा APIP मंजूर केलेला असून त्याच्या निधीचे प्रमाण केंद्र हिस्सा रुपये ३९५२६.९८ लाख व राज्य हिस्सा रुपये ३९५२६.९८ लाख असे आहे. सन २०१६-१७ या वर्षामध्ये SNP (पुरक पोषण आहार ) या कार्यक्रमासाठी केंद्र शासनाने आतापर्यत रुपये १९७६३.५० लाख इतका निधी राज्य शासनास उपलब्ध करुन दिलेला आहे. केंद्र शासनाकडून APIP च्या प्रमाणात निधी प्राप्त झालेला नसला तरी मुलांना वेळेत पोषण आहार उपलब्ध व्हावा यासाठी विशेषबाब म्हणुन APIP च्या मर्यादेत रुपये ८८६०.६५ लाख निधी वितरीत करण्यास शासन मान्यता देत आहे.

२. सन २०१६-१७ मध्ये केंद्र व राज्य हिश्याखाली अर्थसंकल्पित केलेला व वितरीत केलेल्या निधीचा लेखाशिर्षनिहाय तपशील खालीलप्रमाणे आहे.

(रुपये लाखात)

| लेखाशिर्ष **(केंद्र)** | अर्थसंकल्पित निधी | आयुक्त,ए.बा.वि.से.यांना वितरीत केलेला निधी | लेखाशिर्ष **(राज्य)** | अर्थसंकल्पित निधी | आयुक्त,ए.बा.वि.से.यांना वितरीत केलेला निधी | आता वितरीत करावयाचा निधी |
|---|---|---|---|---|---|---|
| २२३६०६१७ | ३६९०.५८ | २१८२.८७ | २२३६०६२६ | ० | ० | ० |
| २२३६०६३५ | २२९२९.६३ | १३५५९.२१ | २२३६०६४४ | १३५५९.२१ | १०८४७.३६ | २७११.८५ |
| २२३६१६७८ | ३२७६४.०२ | १९३७४.६८ | २२३६१६८७ | १९३७४.६८ | १५४९९.७४ | ३८७४.९४ |
| २२३६१६९६ | ७४५८.०३ | ४४१०.२३ | २२३६१७०२ | ७७९३.१० | ४३१९.२४ | २२७३.८६ |
| एकुण | ६६८४२.२६ | ३९५२६.९९ | एकुण | ४०७२६.९९ | ३०६६६.३४ | ८८६०.६५ |

३. SNP (पुरक पोषण आहार ) या कार्यक्रमासाठी केंद्र व राज्य हिश्याचे प्रमाण ५०:५० असे ठरविण्यात आलेले आहे. तथापि केंद्र व राज्य हिश्याच्या प्रमाणात निधी प्राप्त न झाल्यामुळे देयके कोषागारात सादर करताना अडचणी येत आहेत. सदर ५०: ५० प्रमाणाची अट शिथिल करण्यास वित्त विभागाने मान्यता दिलेली आहे.

४. हा शासन निर्णय नियोजन व वित्त विभागाच्या सहमतीने व वित्त विभाग अनौपचारीक संदर्भ क्रमांक ६७/२०१७/व्यय-६, दिनांक १६/३/२०१७ अन्वये मिळालेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३३०२०३५२२७९३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Lalsing Ramchandra Gujar

Digitally signed by Lalsing Ramchandra Gujar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Women And Child Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c3eb5f6c3e4855c5793924cf2a352b4426 6d360de02a2494e1a64477bf79d694, cn=Lalsing Ramchandra Gujar
Date: 2017.03.30 21:24:05 +05'30'

(ला. रा. गुजर)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई
२. मा. मुख्यमंत्र्यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. मंत्री / राज्यमंत्री, महिला व बाल विकास, मंत्रालय, मुंबई
४. मा.मंत्री (वित्त व नियोजन) मंत्रालय,मुंबई
५. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई

६. अपर मुख्य सचिव (नियोजन विभाग) मंत्रालय,मुंबई
७. अपर मुख्य सचिव (वित्त विभाग) मंत्रालय,मुंबई
८. आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, महाराष्ट्र राज्य, नवी मुंबई
९. आयुक्त, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य, पुणे
१०.संचालक, लेखा व कोषागारे संचालनालय, मुंबई
११.सर्व विभागीय आयुक्त
१२.सर्व जिल्हाधिकारी
१३.सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
१४.सर्व विभागीय उपायुक्त, महिला व बाल विकास विभाग
१५.सर्व महिला व बाल विकास अधिकारी, जिल्हा परिषद
१६.सर्व बाल विकास प्रकल्प अधिकारी (ग्रामीण / आदिवासी / नागरी)
१७.महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र -१, मुंबई
१८. महालेखापाल, लेखा परिक्षा, महाराष्ट्र-१, मुंबई
१९.महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र -२, नागपूर
२०.महालेखापाल, लेखा परिक्षा, महाराष्ट्र-२, नागपूर
२१.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
२२.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
२३.निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
२४.ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय ग्रंथालय, विधानभवन, मुंबई
२५.वित्त विभाग, (व्यय-६/अर्थसंकल्प-७)मंत्रालय, मुंबई
२६.नियोजन विभाग, (का.१४७२),मंत्रालय, मुंबई
२७.उप सचिव (श्री गुजर/श्रीमती निवतकर),महिला व बाल विकास,मंत्रालय,मुंबई
२८. निवड नस्ती (कार्यासन ५).